कोरोना पार्श्वभूमीवर कलाकारांना
अर्थसहाय्य देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र.संकीर्ण-८२२०/प्र.क्र.१४७ /सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : १७ डिसेंबर, २०२१**

वाचा :- १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, समक्रमांक दिनांक ३ नोव्हेंबर, २०२१
२) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. सांकासं / १९०६, दिनांक २४ नोव्हेंबर, २०२१

शुध्दीपत्रक

उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयात सुधारणा करण्याचा प्रस्ताव उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील पत्रान्वये,संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्याकडुन प्राप्त झाला आहे.सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयात, खालील तक्त्यानुसार सुधारणा करण्यात येत आहेत :-

| अ. क्र | शासन निर्णयातील मुद्दा | शासन निर्णयामधील सुधारणा |
|---|---|---|
| १ | २ | ४ |
| १. | शासन निर्णयातील नमूद तक्ता क्र.१ "अ" मधील, "५६,००० कलाकार (प्रति कलाकार रु.५,०००/- प्रमाणे)" **च्या ऐवजी** | "५६,००० कलाकार (प्रति कलाकार रू. ५,०००/- प्रमाणे) मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे व पुणे या जिल्हयांनी प्रत्येकी कमाल २००० कलाकार व उर्वरित जिल्हयांनी १५०० कलाकारांची निवड करावयाची आहे" **असे वाचावे** |
| २. | शासन निर्णयातील तक्ता २ मध्ये २ मधील, "प्रत्येक जिल्हयासाठी करण्यात येणा-या रु.२.७५ लक्ष इतक्या निधीचा विनियोग या योजनेअंतर्गत खालील बाबीवर करण्यात यावा.<br>१. प्रशासकीय बाबी<br>२. स्टेशनरी खर्च | "प्रत्येक जिल्हयासाठी करण्यात येणा-या रु.२.७५ लक्ष इतक्या निधीचा विनियोग या योजनेअंतर्गत खालील बाबीवर करण्यात यावा.<br>१. प्रशासकीय बाबी<br>२. स्टेशनरी खर्च<br>३. बैठक आयोजन<br>४. या प्रयोजनार्थ विविध बाबींवर होणारा |

| | | |
|---|---|---|
| | ३. बैठक आयोजन<br>४. या प्रयोजनार्थ विविध बाबींवर होणारा अनुषंगीक खर्च"<br>**च्या ऐवजी** | अनुषंगीक खर्च<br>५.बैठक भत्ता- या प्रयोजनार्थ आयोजित करण्यात येणाऱ्या बैठकीकरिता अशासकीय सदस्यांना शासनाच्या प्रचलित धोरणानुसार भत्ते अनुज्ञेय राहतील"<br>**असे वाचावे** |
| ३. | परिशिष्ट "अ" येथील निवड पध्दती व एकल कलाकारांबाबतच्या पात्रता निकष व अटी येथील मुद्दा क्र. १ मधील, "महाराष्ट्र राज्यातील प्रयोगात्मक कलेतील केवळ कलेवर गुजराण असणारे आर्थिकदृष्ट्या दुर्बल कलाकार"<br>**च्या ऐवजी** | "महाराष्ट्र राज्यातील संघटित व असंघटित क्षेत्रातील पूर्णवेळ कले वर गुजराण असणारे कलाकार उदा.तमाशा, खडीगंमत, वासुदेव, पोतराज, चित्रकथी, बहुरुपी, कीर्तनकार, प्रबोधनकार, वारकरी संप्रदायातील तसेच स्थानिक ठिकाणी आढळणारे प्रयोगात्मक कलाप्रकारातील केवळ कलेवर उदरनिर्वाह असणारे आर्थिक दृष्टया दुर्बल कलाकार"<br>**असे वाचावे** |
| ४) | परिशिष्ट "अ" येथील "ब" मधील अर्जदाराने जोडावयाची कागदपत्रे यातील अ.क्र. ७,<br>"**संगीतबारीसाठी** आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान १०० प्रयोग केल्याचे कलाकेंद्र प्रमुख / आयोजकांची पत्रे / हॅण्डबील / कार्यक्रमपत्रिका / वर्तमानपत्रातील जाहिरात / बातमी / ग्रामसेवक / सरपंच यांचे प्रमाणपत्र जोडणे आवश्यक" | परिशिष्ट "अ" येथील "ब" मधील अर्जदाराने जोडावयाची कागदपत्रे यातील अ.क्र. ७,<br>"**संगीतबारीसाठी** आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान १०० प्रयोग केल्याचे कलाकेंद्र प्रमुख / आयोजकांची पत्रे / हॅण्डबील / कार्यक्रमपत्रिका / वर्तमानपत्रातील जाहिरात / बातमी / ग्रामसेवक / सरपंच यांचे प्रमाणपत्र जोडणे आवश्यक"<br>**वगळण्यात येत आहे.** |
| ५. | परिच्छेद ६ मधील "अ" .<br>"मागणी क्र. झेडडी-२, (०१) (०१) साहित्य कला इ. क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींना आर्थिक सहाय्य, (२२०५ १९०१) ३१ सहाय्यक अनुदाने"<br>**च्या ऐवजी** | "मागणी क्र. झेडडी-२, ८०० इतर खर्च (०१) साहित्य कला क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींना आर्थिक सहाय्य, (०१) (०१) साहित्य कला इ. क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींना आर्थिक सहाय्य (अनिवार्य)<br>(२२०५ १९०१) ५० इतर खर्च"<br>**असे वाचावे** |

६.  सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११२१७१७१३२२१२२३ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

VILAS RAMRAO THORAT

Digitally signed by VILAS RAMRAO THORAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, pseudonym=2908C178C06A08E995849046F8BCFB7325B57851, serialNumber=CB03C92B399CC89310BF1378C184D97A4B7B9B98E926EA8E71DD7BC9CB273631, cn=VILAS RAMRAO THORAT
Date: 2021.12.20 11:34:59 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग व नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
६. सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद/आयुक्त, महानगर पालिका /मुख्याधिकारी, नगर पालिका
७. सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
८. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई ४०० ०३२
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११.महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
१२.महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१५.अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१६.निवड नस्ती, सां.का.४